**अनुसूचित जाती व अनुसूचित जमाती अत्याचार प्रतिबंध अधिनियम १९८९ अंतर्गत, उपविभागीय दक्षता व नियंत्रण समिती स्थापन करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग**
**शासन निर्णय क्र. युटीए-२०१६/प्र.क्र. ३७१/सामासु**
मंत्रालय विस्तार इमारत, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक : २८ डिसेंबर, २०१६

<u>वाचा</u> : संयुक्त सचिव, केंद्रीय सामाजिक न्याय व अधिकारीता मंत्रालय, नवी दिल्ली यांची अधिसूचना क्रमांकः ११०१२/२/२००८/पीसीआर (डेस्क) दि. ८ नोव्हेंबर २०१३.

**प्रस्तावना -**

संयुक्त सचिव, केंद्रीय सामाजिक न्याय व अधिकारीता मंत्रालय, नवी दिल्ली यांची अधिसूचना दि. ८ नोव्हेंबर २०१३. अन्वये अनुसूचित जाती व अनुसूचित जमाती अत्याचार प्रतिबंध अधिनियम १९८९ अंतर्गत उपविभागीय दक्षता व नियंत्रण समिती स्थापन करण्याच्या सूचना दिलेल्या आहेत. मा. मुख्यमंत्री यांच्या अध्यक्षतेखाली राज्यस्तरीय उच्चाधिकार दक्षता व नियंत्रण समितीच्या दिनांक ११/०३/२०१५ च्या बैठकीत अनुसूचित जाती जमाती अत्याचार प्रतिबंध कायद्याच्या अमंलबजावणीसाठी प्रत्येक जिल्ह्यात संबंधित उपविभागीय अधिकारी यांच्या अध्यक्षतेखाली समिती गठीत करण्याचे आदेश दिलेले आहेत. त्या अनुषंगाने उपविभागीय दक्षता व नियंत्रण समिती स्थापन करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

अनुसूचित जाती व अनुसूचिती जमाती अत्याचार प्रतिबंध अधिनियम १९८९ अंतर्गत उपविभागीय दक्षता व नियंत्रण समिती खालीलप्रमाणे गठीत करण्यात येत आहे.

| | |
|---|---|
| १. उपविभागीय अधिकारी | अध्यक्ष |
| २. पोलीस उपअधिक्षक | सदस्य |
| ३. अनु. जाती व जमातीचे पंचायत समिती सदस्य | सदस्य |
| ४. तहसिलदार (उपविभागाअंतर्गत सर्व तालुक्यातील तहसीलदार) | सदस्य |
| ५. अनु. जाती जमातीचे सामाजिक कार्यकर्ता (दोन) | सदस्य |
| ६. अनु. जाती, जमातीचे अशासकीय संस्थांचे सामाजिक कार्यकर्ता (दोन) | सदस्य |
| ७. केंद्र शासनाने नामनिर्देशित केलेले तीन सामाजिक कार्यकर्ता | सदस्य |
| ८. गटविकास अधिकारी, पंचायत समिती (उपविभागीय स्तर वगळून) | सदस्य |
| ९. गटविकास अधिकारी, पंचायत समिती (उपविभागीय स्तरावरील) | सदस्य सचिव |

या समितीची दर तीन महिन्यातून आढावा बैठक घेऊन त्याबाबतचा अहवाल शासनास, विशेष पोलीस महानिरीक्षक (नाहसं) महाराष्ट्र राज्य, मुंबई व आयुक्त, समाजकल्याण, पुणे यांना सादर करण्यात यावा.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१६१२२८१६५८५०१०२२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Dnyandev Laxman Sul

Digitally signed by Dnyandev Laxman Sul
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Social Justice And Special Assistance, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=a19e16d10b98348341561863c7561e9fc35bb428cdc3ea443c0263495f76285a, serialNumber=0a540933faf44a550ca357b423fa83e6fdce81a4746d167dae68daa29726d41d, cn=Dnyandev Laxman Sul
Date: 2016.12.28 17:01:44 +05'30'

**(ज्ञा. ल. सुळ)**

उपसचिव, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१. मा. मुख्यमंत्री यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
२. सर्व मा. मंत्री यांचे खाजगी सचिव,
३. सर्व मा. राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव
४. मा. मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई.
५. सर्व मंत्रालयीन विभागाचे सचिव/प्रधान सचिव/ अ.मु.स.
६. पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
७. विशेष पोलीस महानिरीक्षक, नागरी हक्क व संरक्षण, महाराष्ट्र राज्य, मुंबई
८. महासंचालक, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मुंबई
९. महालेखापाल, महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपूर
१०.सर्व विभागीय आयुक्त,
११.सर्व जिल्हाधिकारी तथा जिल्हादंडाधिकारी
१२.सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद
१३.आयुक्त, समाजकल्याण महाराष्ट्र राज्य, मुंबई
१४.सर्व प्रादेशिक उपायुक्त, समाजकल्याण विभाग
१५.सर्व सहायक आयुक्त, समाजकल्याण विभाग
१६.सर्व समाजकल्याण अधिकारी, गट-अ, जिल्हा परिषद.
१७.निवड नस्ती, सामासु.

------------------xxxxxxxxxxxx-------------------